महाराष्ट्र विकास सेवा, गट ब मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांकः मविसे १०/२०१४/प्र.क्र.१८९/आस्था-३अ

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१
तारीख: १२ सप्टेंबर, २०१४

**प्रस्तावना :-**

शासनाच्या संकेतस्थळावर विभागाचा समक्रमांकाचा दिनांक १२ फेब्रुवारी, २०१४ चा शासन आदेश अनवधानाने चुकीची तारीख टाकून निर्गमित करण्यात आला आहे. सदर आदेश या आदेशान्वये अधिक्रमित करुन आता खालीलप्रमाणे सुधारीत आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

**आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत कलम ४(४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील खालील अधिकाऱ्याच्या बदलीचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिकाऱ्याची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद व ठिकाण | बदलीने नियुक्तीचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.जितेंद्र राजेंद्र देवरे | बाल विकास प्रकल्प अधिकारी, सोनपेठ , जिल्हा परभणी | सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, संगमनेर, जि.अहमदनगर | रिक्त पदी |

२. संबंधित अधिकाऱ्याने त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिका-याला त्याच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्याच्या सूचना द्याव्यात.

४. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११५२०३१४९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Patil Ravindra Namdev

Digitally signed by Patil Ravindra Namdev
DN: CN = Patil Ravindra Namdev, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.09.12 17:11:41 +05'30'

**( रविंद्र पाटील )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद/ नाशिक विभाग, नाशिक
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी / अहमदनगर
४. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर
५. संबंधित अधिकारी (द्वारा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी)
६. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
७. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
८. मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक
९. मा.प्रधान सचिव (महिला व बाल विकास विभाग) यांचे स्वीय सहायक
१०.कार्यासन क्र. आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
११.निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३अ), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.